# लहानसा लाल दीपस्तंभ आणि मोठ्ठा करडा पूल

लेखक - हिल्डेगार्ड एच स्विफ्ट आणि लिंड वॉर्ड

भाषांतर - वंदना भागवत

कोणे एके काळी, लोकांनी हडसन नदीच्या किनाऱ्यावर एक लहानसा दीपस्तंभ बांधला.

नदी झपकन वळायची. मग येणाऱ्या जाणाऱ्या होड्यांना समोरुन येणाऱ्या दुसऱ्या नावा दिसायच्या नाहीत. नावा आपटून फुटू नयेत म्हणून तिथं खडकावर तो दीपस्तंभ बांधला.

तो लहानसा होता पण गोलमटोल आणि लालम लाल होता.

गोलमटोल, लालम लाल आणि धमाल.

त्याला आपला फार फार अभिमान वाटायचा.

त्याच्या पाठीमागे पसरलं होतं न्यूयॉर्क गाव.
खूप लोक राहायचे गावात.

त्याच्या समोर हिंडायच्च्या होड्या झोकात. आणि होड्यांमध्ये बसून लोक हिंडायचे मजेत. खाली-वर, वर-खाली तरंगत जायच्या होड्या. नदी वाहत असायची पाण्याचे गालिचे उलगडत. उंच उंच डोंगरात एक तळं होतं, तिथून यायची हडसन नदी, डोंगरावरुन उड्या मारत, हिंडत, फिरत, लोळत, घरंगळत जात राहायची पुढे पुढे. आल्बनीला वळसा घालून पुढे. समुद्राची गळाभेट होईपर्यंत  वाहत राहायची.

नदीवरच्या होड्या जाता-येता लहानशा दीपस्तंभाशी गप्पा मारायच्या.

"भों भों भों! भाऊ काय म्हणतो?" मोठी आगबोट भोंगा वाजवत, गडगडत्या आवाजात बोलायची.

"ससससससलाम!' काटकुळं होडकं
सुटकन किनाऱ्याशी जाताना म्हणायचं.

"झप, झप, झप, झिंदाबाद!" भलं मोठ्ठं,
लठ्ठमुठ्ठ काळं जहाज म्हणायचं.
कोळशांचा पेटारा पडावावर लादून घेऊन जायचं ते.

दिवसा तो लहानसा लाल दीपस्तंभ काही उत्तर
द्यायचा नाही.

होड्या हाका मारायच्या.

पण तो मात्र चिडिचूप.

पण दररोज रात्री, अंधार पडता पडता, एक माणूस यायचा आणि लहानशा लाल दीपस्तंभाची देखभाल करायचा. त्याच्या किल्ल्या खणखण वाजायच्या. मग त्या किल्ल्यांनी तो दीपस्तंभाचं छोटसं लाल दार उघडायचा. आतल्या खड्या पायऱ्यांचा गोल गोल जिना चढून जायचा- वर, वर, वर, एकदम वर. तो त्याची जाडजूड पांढरी टोपी काढायचा. मग त्याची काळी गंमतशीर किल्ली काढायचा आणि गॅस सुरु करायचा.

वर, वर, वर, खालच्या सहा लाल टाक्यांमधून गॅस चढायचा.

मग लहानसा लाल दीपस्तंभ साधं सरळ बोलायचा. आपले दिवे लावायचा.

चम.चम. चम.

एक क्षणभर उजेड लख्ख. दोन क्षण अंधार! लक्ष द्या! माझ्याकडं बघा! धोका, धोका, धोका!

इथं उभा आहे मी! खडकावर! दूर जा!

त्याला मोठ्ठं झाल्यासारखं वाटलं आणि उपयोगी आणि महत्वाचं असल्यासारखं. मी नसलो तर या होड्या कुठं जातील? त्याला वाटलं.

खूप खूप अभिमान वाटला आपला.

नावा उजेड बघायच्या आणि सुरक्षित पुढं जायच्या.  नदीच्या प्रवाहात जात राहायच्या. लहानश्या लाल दीपस्तंभाबद्दल त्यांना कृतज्ञ वाटायचं.

कधीकधी नदीवर धुकं रांगत यायचं. लहानश्या लाल दीपस्तंभाच्या आत एक मोठ्ठं काळं घड्याळ होतं. तो माणूस यायचा आणि त्याला किल्ली द्यायचा. तो किल्ली फिरवायचा गोल गोल गोल. घड्याळ बाहेरच्या लोखंडी घंटेशी जोडलेलं होतं.

मग ती घंटा वाजायला लागायची.

घण्ण! घण्ण! घण्ण! घंटा म्हणायची.

चम! चम! चम! दिवा म्हणायचा.

धो--का! घंटा सांगायची.

लहानश्या लाल दीपस्तंभाकडं दोन आवाज होते तर!

दररोज त्याला मोठं झाल्यासारखं वाटायचं आणि अभिमान वाटायचा.

व्वा! मी या नदीचा राखणदार आहे. तो विचार करायचा.

मग एके दिवशी काही कामगार आले
आणि त्यांनी खणायला सुरुवात केली.

ते खणत होते. खणत होते. खणत होते.

हळू हळू स्टीलचे प्रचंड खांब
आकाशाकडे झेपावायला लागले.

पडावांमधून खूप माणसं हडसन नदीवर आली. पडावात मोठ्ठी रिळं होती, प्रत्येक रिळांवर पांढरा धागा गुंडाळला होता.

नदीवरच्या सगळ्या नावा जागच्या जागी थांबल्या.

जवळपासच्या होड्या बघायला लागल्या.

नदीसुध्दा चिडिचुप्प झाली. गुमसुम. गुमसुम.

ती माणसं परतून आली. ती खूपच आनंदात होती.

"पहिल्या वायरी तर झाल्या लावून." ते म्हणाले, "पहिला झुलता पूल लवकरच वर येईल." बाकीची माणसं आनंदात ओरडली, 'हुर्रेर्र!"

म्हणजे काय? काय म्हणतात ती? लहानसा लाल दीपस्तंभ विचार करत होता.

या वायरी म्हणजे काय? त्या लावून झाल्या म्हणजे काय?

अनेक दिवस गेले. कितीतरी आठवडे लोटले. दररोज रात्री दीपस्तंभ सरळ साधा बोले.

चम! चम! चम!

त्याच्या जवळच ती करडी गोष्ट उंच उंच होताना तो बघत होता. महाकाय मनोरे आकाशाला स्पर्श करत होते. लोखंडाचे भरभक्कम दोर नदीच्या या काठावरुन त्या काठावर जात होते.

केवढं मोठ्ठं होतं ते!

कसलं भारी!

किती शक्तिशाली!

हडसन नदीच्या पात्रावर या काठावरुन त्या काठापर्यंत मोठ्ठा करडा पूल उभा राहिला. त्याच्यामुळं लहानश्या लाल दीपस्तंभाला अगदीच इवलंसं झाल्यासारखं वाटलं.

मग एके रात्री प्रकाशाचा झोत जवळच्या करड्या मनोऱ्याच्या डोक्यावरुन आकाशावर पडला.

लख्ख! वळला! परत लख्ख!

आता माझी काही गरज उरली नाही. लहान लाल दीपस्तंभ स्वतःशीच म्हणाला. माझा उजेड इवलासा. याचा उजेड केवढा मोठ्ठा!

बहुतेक ते मला सोडून देतील.

बहुतेक ते मला पाडून टाकतील.

बहुतेक ते माझा दिवा लावायचं विसरुन जातील.

त्या रात्री तो वाट बघत उभा राहिला.

त्याला उदास वाटलं आणि चिंता वाटली आणि चमत्कारिक वाटलं.

तो माणूस का नाही आला?

लहानसा लाल दीपस्तंभा ना बोलू शकत होता ना चमकू शकत होता.

मग मध्यरात्री वादळ झालं. घों, घों, घों वारा
सुटला. लाटा खळ्ळाळ खळ्ळ किनाऱ्यावर
आपटायला लागल्या.

दाट धुकं नदीवर पसरलं आणि एकेका होडीला
मुठीत घेऊ लागलं.

ते लठ्ठमुठ्ठ जहाज आल्बनीवरुन नुकतंच परत येत होतं. ते धुक्यात सापडलं. त्याला काही दिसेना. धुक्यानं त्याला झाकून टाकलं. ते लहानश्या लाल दीपस्तंभाला शोधू लागलं.  पण त्याला काही तो सापडेना. घंटेचा आवाज का नाही येत? त्यानं कानोसा घेतला पण ऐकू नाही आला. धुकं इतकं घनदाट होतं की त्याला उंच करड्या पुलावरुन झोत टाकणारा दिवाही दिसेना.

धडाम धूम! धडाम धूम! धडाम धूम!

ते लठ्ठमुठ्ठ जहाज खडकावर आदळलं. आणि तुकडे तुकडे होऊन पडलं.

मग त्या मोठ्ठ्या करड्या पुलानं लहानश्या लाल दीपस्तंभाला हाक मारली:

"ए धाकल्या भावा, कुठं गेला तुझा दिवा?"

"मी तुझा भाऊ आहे का पुला?" दीपस्तंभाला आश्चर्य वाटलं. "तुझा उजेड किती प्रखर, मला वाटलं आता माझ्या चमचमण्याची काय गरज?"

"मी विमानांना हाका मारतो," पूल ओरडला, "मी हवाई जहाजांना रस्ता दाखवतो. पण या नदीचा राखणदार तूच आहेस अजून. चल चल, घाई कर, तुझ्या उजेडाची चमचम कर. प्रत्येकाची आपली जागा असते, धाकल्या भावा!"

म्हणून मग लहानश्या लाल दीपस्तंभानं परत एकदा चमचम करायचा प्रयत्न केला. पुन्हा पुन्हा पुन्हा - पण दिवे काही लागेनात.

संपलो मी! त्याला वाटलं.

हा शेवट होता खराखुरा.

माझा तो माणूस आला नाही. मी मलाच किल्ली नाही ना देऊ शकत. मी काही परत चमचमणार नाही.

आणि त्याला फार फार दुःख झालं.

पण मग एकदाची त्याला खालचं दार उघडल्याचा आवाज आला.

एकदाची त्याच्या जिन्यावरुन धावत धावत वर चढणाऱ्या पावलांचा आवाज आला.

ओहो! तो माणूस आला होता त्याची काळजी घ्यायला.

"कुठं गेला होतास अरे तू? मला वाटलं आता कधीच येणार नाहीस तू."

"ती नाठाळ मुलं! वांड आहेत अगदी! त्यांनी किल्ल्या पळवल्या ना माझ्या! पण आता परत असं घडणार नाही! कध्धी कध्धी..."

आता लहानश्या लाल दीपस्तंभाला माहिती झालं-
त्याची गरज होती.

पुलाला तो हवा होता.

माणसाला तो हवा होता.

जहाजांना तर तो हवाच होता. अजूनही.

त्यानं त्याचा लांबच लांब, चमचमता, झगमगता
प्रकाश किरण टाकला, रात्र उजळली.

एक क्षण लख्ख. दोन क्षण अंधार!

चम, चम, चम!

लक्ष द्या! धोका! माझ्याकडे बघा!

लवकरच घंटाही वाजायला लागली.

घण! घण! घण!

धो--का! धो--का! तो ओरडला.

लहानश्या लाल दीपस्तंभाकडे करायला अजूनही काम होतं.

आणि त्याला त्याचा आनंद होता.

आणि आता पुलाच्या त्या प्रखर झोताच्या खाली उभ्या असलेल्या दीपस्तंभाचा उजेड अजूनही चमचमतो.

महाकाय उंचच उंच पुलाशेजारी लहानसा दीपस्तंभ डटून उभा राहातो. तो लहानसाच आहे हे त्याला माहितीय, पण तरी त्याला **खूप खूप अभिमान** वाटतो स्वतःचा.

दररोज गाडीतून हिंडायला न्यूयॅ।र्कचे लोक नदीच्या वरच्या भागात जातात ते वळून वळून त्याच्याकडे बघतात. दोघंही आहेत तिथं- मोठ्ठा करडा पूल आणि लहानसा लाल दीपस्तंभ.

विश्वास नाही बसत तुमचा? जा तर मग आणि बघून या!

**हिल्डेगार्ड एच. स्विफ्ट**-[१८९०-१९७७]

यांनी मुलांसाठी अनेक पुस्तके लिहिली. *द रेलरोड टू फ्रीडम* हे पुस्तक म्हणजे स्विफ्टबाई असे समीकरण आहे. या पुस्तकाची न्यूबेरी आनर पुरस्कारासाठी निवड झाली होती. स्विफ्टबाईंनी त्यांचे सगळे आयुष्य शूर अमेरिकन माणसांची माहिती गोळा करण्यात घालवले. द लिट्ल रेड लाईटहाऊस... ही त्यांची सर्वात लोकप्रिय चित्रकथा आहे.

**लिंड वार्ड**-[१९०५-१९८५]

यांनी मुलांसाठीच्या आणि मोठ्यांसाठीच्या दोनशे पुस्तकांना चित्रे काढली. १९५३ मध्ये त्यांना *द बिग्गेस्ट बेअर* या पुस्तकामध्ये जलरंगात काढलेल्या चित्रांसाठी काडेलकॅ।ट मेडल मिळाले. ते लाकडात कोरीवकाम करण्यासाठीही प्रसिध्द होते. अमेरिकेत आणि बाहेरच्या देशांतही त्यांची लाकडी शिल्पे वस्तूसंग्रहालयात ठेवलेली आढळतील.

---

१८८० मध्ये बिडाच्या लोखंडात बांधलेला खराखुरा लाल दीपस्तंभ सुरुवातीला न्यू जेरेसीतील सँडी हूक येथे किनाऱ्यावरचा राखणदार म्हणून ठेवण्यात आला होता. १९२१ मध्ये तेथून हलवून त्याला न्यूयॅ।र्कमधील हडसन नदीच्या काठावर ठेवले. मॅनहॅटन बेटावरचा तो एकमेव दीपस्तंभ होता. त्याला जेफ्री हूक दीपस्तंभ म्हणत. १९३२ मध्ये जॅ।र्ज वॅ।शिंग्टन पूल तयार झाला तेव्हा त्याला बाद केले. १९५१ मध्ये तो लिलावात काढायचे ठरवले पण लोकांनी आणि न्यू यॅ।र्क टाईम्स या वर्तमानपत्राने तो लिलाव थांबवला. तो न्यूयॉर्क शहराला भेट देण्यात आला. तो दररोजच्या वापरात नव्हता, म्हणताना तो गंजला, त्याच्या चौथऱ्याला तडे गेले, त्याच्यावरचा दिवा बंद झाला. त्याची दारं कायमची बंद करुन टाकली.

मग तीस वर्षांनी, तो दीपस्तंभ राष्ट्रीय ऐतिहासिक स्थळांच्या यादीत आला. १९८० मध्ये त्याची डागडुजी केली. शहरातील प्रेक्षणीय स्थळ म्हणूनही त्याची नोंद १९९१ मध्ये झाली. त्याच्या साठाव्या वाढदिवसाला २००२ मध्ये या पुस्तकाचे प्रकाशन झाले. द लिट्ल रेड लाईट हाऊस ॲन्ड द ग्रेट ग्रे ब्रिज- १९४७ पासून दुर्लक्षित असलेला हा दीपस्तंभ नव्याने चमकायला लागला. नदीतील होड्यांना इशारा करणारे त्याचे भिंग बदलण्यात आले. त्यामुळे तो हडसन नदीच्या पाण्यावर नव्याने चमचम करायला लागला.